# महाराष्ट्र शासन
## सामान्य प्रशासन विभाग
### शासन ज्ञापन क्रमांक साप्रवि ३२०३६/२३/२०२५/रवका.-१

६३१, मंत्रालय (विस्तार), मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई. पिन ४०० ०३२.

दिनांक : ०६ जून, २०२५.

**विषय** :- विधिविषयक कामे पार पाडण्यासाठी प्रशासकीय मान्यता देणेबाबत.
मे.विधि सेंटर फॉर लिगल पॉलिसी, नवी दिल्ली.

**ज्ञापन.**

*"Ease of Doing Business"* याकरिता महाराष्ट्र राज्य अधिनियमांतील किरकोळ अपराधांच्या बाबतीत शिक्षेच्या तरतुदी रद्द करण्याच्या दृष्टीने राज्य अधिनियमांची, राज्य शासनाशी विचारविनिमय करुन, समीक्षा करणे, दंडनीय तरतुदीचे मूल्यमापन करुन शिक्षेच्या तरतुदी रद्द करण्यायोग्य अपराध निश्चित करणे आणि त्या अनुसार संबद्ध अधिनियमांमध्ये करावयाच्या सुधारणांचे प्रारूप राज्य शासनास सादर करणे, या प्रयोजनांसाठी महाराष्ट्र शासन व मे. विधि सेंटर फॉर लिगल पॉलिसी, नवी दिल्ली, यांच्यात दिनांक ०८/०५/२०२५ रोजी करार निष्पादित करण्यात आला आहे.

२. उक्त करारनाम्यानुसार, उपरोक्त कामांसाठी मे.विधि सेंटर फॉर लिगल पॉलिसी, नवी दिल्ली यांना एकूण रु.३७,९७,९३६/- मोबदला म्हणून पुढीलप्रमाणे टप्प्याटप्प्याने अदा करावयाचे आहेत-

| "Sr.No. | Payment Milestone | Percentage of Consideration Payable |
|---|---|---|
| 1. | Upon signing of this MoU | 20% |
| 2. | On submission of Interim Report 1 | 30% |
| 3. | On submission of Interim Report 2 | 30% |
| 4. | On submission of Final Report | 20%" |

३. त्या अनुसार, मे.विधि सेंटर फॉर लिगल पॉलिसी, नवी दिल्ली यांना दिनांक ०८/०५/२०२५ रोजी राज्य शासनाशी केलेल्या करारनाम्यात विनिर्दिष्ट विधिविषयक कामे, त्यात निर्दिष्ट केलेल्या वेळापत्रकानुसार, पार पाडण्यासाठी रु.३७,९७,९३६/- (रुपये सदतीस लक्ष, सत्त्याण्णव हजार, नऊशे छत्तीस फक्त) मोबदला म्हणून टप्प्याटप्प्याने प्रदान करण्यास, याद्वारे, प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

४. उक्त खर्च हा सामान्य प्रशासन विभाग- मागणी क्रमांक ए-४, २०५२ सचिवालयीन- सर्वसाधारण सेवा, ०० ०९० सचिवालय (००), (००)(०१) सामान्य प्रशासन विभाग (अनिवार्य) (२०५२००२५), १३ कार्यालयीन खर्च, या लेखाशीर्षाखाली चालू वित्तीय वर्षात (सन २०२५-२६) उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

५. उक्त रु.३७,९७,९३६/-इतकी रक्कम अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई, येथून आहरित करण्यासाठी कक्ष अधिकारी, रोख शाखा, सामान्य प्रशासन विभाग, यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. हे शासन ज्ञापन, नियोजन विभागाशी विचारविनिमय करुन (अनौ. संदर्भ क्र. ३२८/का.१४४३, दिनांक २०/०५/२०२५) आणि वित्त विभागाच्या सहमतीने (अनौ. संदर्भ क्र. ३६०/व्यय-४, दिनांक २३/०५/२०२५) निर्गमित करण्यात येत आहे.

७. हे शासन ज्ञापन, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२५०६०६१४५५३४६६०७ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHAHAJAHAN SHAKUR MULANI

Digitally signed by SHAHAJAHAN SHAKUR MULANI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=d203fe3b025c07c7692f5c23a43a4905f46cdde0ef54f3944caf1c620a5bc64e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BF4EB2A0C007D6CA5A25B0E564499E5FF904468E1A96902315E3E67299424039, cn=SHAHAJAHAN SHAKUR MULANI
Date: 2025.06.06 14:56:33 +05'30'

**(शहाजहान मुलाणी)**
**शासनाचे उप सचिव.**

**प्रति,**

१) प्रधान महालेखापाल (लेखा व हकदारी/लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
२) अवर सचिव (रोखशाखा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (रोखशाखेच्या मार्फत).
४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

**प्रत-**

१) मे. विधि सेंटर फॉर लिगल पॉलिसी, नोंदणीकृत कार्यालय, ए-३१३, पहिला मजला, डिफेन्स कॉलनी, नवी दिल्ली-११००२४.
२) निवड नस्ती, रवका-१.